**शिवछत्रपती क्रीडा पुरस्कार व अन्य क्रीडा पुरस्कार**
**सुधारित नियमावली.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शिछपु २०१८/प्र. क्र.१२७/क्रीयुसे-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०२०.

<u>वाचा :</u>- १. शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो २०१२/प्र.क्र. १५८/१२/क्रीयुसे २ दिनांक १६.१०.२०१७
२. शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो २०१२/प्र.क्र. १५८/१२/क्रीयुसे २ दिनांक ८.१२.२०१७
३. शासन शुध्दीपत्रक क्रमांक : शिछपु २०१८/प्र.क्र. १२७/१८/क्रीयुसे २ दिनांक २४.१०.२०१८
४. शासन निर्णय क्रमांक : शिछपु २०१८/प्र.क्र.१२७/१८/क्रीयुसे २ दिनांक १.८.२०१९

**<u>प्रस्तावना:-</u>**

महाराष्ट्र राज्यातील नामवंत सर्वोत्कृष्ट क्रीडापटूंना शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार देण्याची योजना सन १९६९-७० पासून आणि राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर देशाचे नाव उज्ज्वल करणारे खेळाडू घडविण्याऱ्या क्रीडा मार्गदर्शकांना उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार देण्याची योजना सन १९८८-८९ पासून शासनाने अंमलात आणली आहे. तसेच ज्येष्ठ क्रीडापटू, क्रीडा मार्गदर्शक, संघटक-कार्यकर्ते व क्रीडा क्षेत्राशी संबंधित अशा ज्या व्यक्तीनी क्रीडा क्षेत्रासाठी आपले सर्वस्व पणाला लावून आपले जीवन क्रीडा विकासासाठी व्यतीत केले आहे, अश्या जेष्ठ क्रीडा महर्षींचा गौरव करण्यासाठी सन २००१-०२ पासून महाराष्ट्र शासनाने शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार देण्याची योजना अंमलात आणली आहे.

२. शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू, संघटक/कार्यकर्ते), एकलव्य राज्य क्रीडा पुरस्कार, साहसी क्रीडा पुरस्कार व जिजामाता क्रीडा पुरस्कार या पुरस्कारांची नियमावली शासन निर्णय दिनांक १६ ऑक्टोबर, २०१७, शासन शुध्दीपत्रक दिनांक ८ डिसेंबर, २०१७ व दि. २४ ऑक्टोबर, २०१८ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. संदर्भांकीत क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये पुरस्कार नियमावलीत सुधारणा करण्यासाठी श्री. धनराज पिल्ले, पद्मश्री पुरस्कारार्थी यांच्या अध्यक्षतेखाली अन्य १५ सदस्यांची समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने अहवाल शासनास सादर केला आहे. या अहवालाचा सर्वकष विचार करण्यात आला. पुरस्कार नियमावलीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील खेळाडू, संघटक/कार्यकर्ते, मार्गदर्शक यांना शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू, संघटक/कार्यकर्ते), एकलव्य राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग), साहसी क्रीडा पुरस्कार व जिजामाता क्रीडा पुरस्कार देऊन यांचा गौरव

करण्यात येतो. पुरस्कारबाबतचे यापुर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहेत. या शासन निर्णयाव्दारे खालीलप्रमाणे नियमावली विहित करण्यात येत आहे.

(१) **<u>शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार :-</u>**

जेष्ठ क्रीडापटू, क्रीडा मार्गदर्शक, क्रीडा संघटक/कार्यकर्ते व क्रीडा क्षेत्राशी संबंधित अशा ज्या व्यक्तीनी क्रीडा व खेळासाठी आपले सर्वस्व पणाला लावून आपले जीवन क्रीडा विकासासाठी व्यतीत केले आहे, अशा क्रीडा महर्षींचा गौरव करण्याच्या दृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट "अ" व "अ-१"** मध्ये दर्शविलेल्या नियमावलीनुसार शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

(२) **<u>उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार:-</u>**

क्रीडा क्षेत्रातील ज्या क्रीडा मार्गदर्शकांनी केलेल्या मार्गदर्शनामुळे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर खेळाडू सहभागी होण्यास व घडविण्यास मदत झाली असेल, त्याचप्रमाणे ज्यांच्या मार्गदर्शनामुळे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर खेळाडू निर्माण झाले असतील अशा क्रीडा मार्गदर्शकांचा गौरव करण्याच्या दृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट "अ" व "अ-२"** मध्ये दर्शविलेल्या नियमावलीनुसार उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

**(३) <u>शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू):-</u>**

क्रीडा क्षेत्रात विशेष उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या महाराष्ट्रातील खेळाडूंचा गौरव करण्याच्या दृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट-"अ" व "अ-३"** येथे नमूद केलेल्या नियमावलीनुसार सदर पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

(४) **<u>शिवछत्रपती राज्य साहसी क्रीडा पुरस्कार :-</u>**

साहसी क्रीडा प्रकारांमध्ये विशेष उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या राज्यातील खेळाडूंचा गौरव करण्याच्या दृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट-"अ" व "अ-४"**येथे नमूद केलेल्या नियमावलीनुसार सदर पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

**<u>(५) शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू):-</u>**

क्रीडा क्षेत्रात विशेष उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या महाराष्ट्रातील (दिव्यांग) खेळाडूंचा गौरव करण्याच्या दृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट-"अ" व "अ-५"** येथे नमूद केलेल्या नियमावलीनुसार सदर पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

**(६) <u>जिल्हा क्रीडा पुरस्कार :-</u>**

जिल्ह्यातील गुणवंत क्रीडापटू, क्रीडा मार्गदर्शक यांच्या कार्याचे / योगदानाचे मूल्यमापन करुन त्यांचा गौरव करण्याच्यादृष्टीने सोबतच्या **परिशिष्ट** "अ-६" मध्ये दर्शविलेल्या नियमावलीनुसार जिल्हा क्रीडा पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

**(७)** उपरोक्त पुरस्कार वितरणाच्या आयोजन संदर्भात खर्चाचा तपशील आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांनी पुरस्कार वितरण समारंभाच्या आधी शासनास सादर करुन मंजूर करुन घ्यावा.

**(८)** उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष २२०४- क्रीडा व युवक सेवा - १०४ क्रीडा व खेळ - (०३) (०१) राज्य क्रीडा पुरस्कार कार्यक्रमाचे आयोजन ५० - इतर खर्च योजनेतर योजना, संगणक क्रमांक (२२०४-१५६९) या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षात केलेल्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**(१०)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२४२००३०५३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.01.24 19:42:34 +05'30'

**( इम्तियाज काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
२) मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे स्वीय सहायक
३) मा. राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे स्वीय सहायक
४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
५) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य
६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०) सर्व एकविध राज्य संघटना व महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशन (संचालनालयामार्फत)
११) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
१२) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१३) ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (क्रीयुसे - १, क्रीयुसे -३)
१५) निवडनस्ती, क्रीयुसे-२.

## परिशिष्ट "अ"

## शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कारासाठी सर्व साधारण नियमावली

**पुरस्काराचे स्वरुप, अर्ज पध्दत, अर्जाची पूर्व छानन्नी, पुरस्कार निवडीचे वेळापत्रक, निवड समिती संरचना - शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू), शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू), उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार व शिवछत्रपती राज्य साहसी क्रीडा पुरस्कार.**

**नियम क्रमांक १) पुरस्काराचे स्वरुप** - पुरस्कारामध्ये खालील बाबींचा समावेश राहील.

(अ) गौरवपत्र

(ब) स्मृतिचिन्ह

(क) जीवन गौरव पुरस्कारासाठी रोख रु. ३,००,०००/- (रु. तीन लाख फक्त)
इतर सर्व पुरस्कारासाठी प्रत्येकी रोख रु. १,००,०००/- (रु. एक लाख फक्त)

(ड) क्रीडा पुरस्कार जाहीर होणे व जाहीर झालेल्या पुरस्काराचे वितरण यामधील कालावधी बरेचदा अत्यल्प असल्याने क्रीडा विभागा मार्फत ब्लेझरचे कापड खरेदी करून व क्रेस्ट (क्रेस्ट वरील मजकूर मराठीत असावा) उपलब्ध करुन देऊन ब्लेझर शिलाईसाठी रोख रक्कम/NIFT/RTGS द्वारे रु. ३,०००/- पुरस्कारार्थ्यांस अदा करण्यात यावी.

**नियम क्रमांक २) अर्ज करण्याची पध्दत :**

(१) अर्जदारास आपल्या कामगिरीच्या तपशिलासह Online पध्दतीने अर्ज website वर उपलब्ध करुन देण्यात यावा.

(२) अपूर्ण अर्जांचा विचार केला जाणार नाही.

(३) अर्ज केलेल्या व्यक्तीची पुरस्कारासाठी निवडले गेलेच पाहिजे असा त्यांना हक्क सांगता येणार नाही.

(४) ऑनलाईन भरण्यात आलेल्या अर्जाची व अपलोड करण्यात आलेल्या कागदपत्रांची एक प्रत डाऊनलोड व प्रिंट काढून सदर प्रतीवर स्वसाक्षांकित करावे व संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांचेकडे विहीत केलेल्या मुदतीत सादर करावी. फक्त ऑनलाईन अपलोड केलेली कागदपत्रे पुरस्कारासाठी विचारात घेतली जातील. त्याशिवायचे ऑफ लाईन सादर केलेली कागदपत्रे विचारात घेतली जाणार नाहीत.

(५) अर्जदार राज्य संघटनेमार्फत शिफारस घेऊन अर्ज करीत असल्यास संघटनेच्या कार्यकारीणी मंडळाने केलेल्या ठरावाच्या प्रतीसह प्रस्ताव, कागदपत्रे अर्जा सोबत upload करण्यात यावी.

(६) पुरस्कार विभागून दिला जाणार नाही..

(७) एखादया वर्षी पुरस्कारासाठी पात्र अशी व्यक्ती आढळून न आल्यास पुरस्कार घोषित केला जाणार नाही..

(८) एखादया वर्षी हा पुरस्कार देण्यात न आल्यास पुढील वर्षासाठी जादाचा पुरस्कार म्हणून तो गणण्यात येणार नाही.

(९) सदर पुरस्कार मरणोत्तर जाहीर करण्यात येऊ नये..

(१०) पुरस्कारासाठी कोणत्याही प्रकारचा दबाव आल्यास सदर व्यक्तीस अपात्र समजण्यात येईल.

(११) पुरस्कार रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील आणि तसे घडल्यास पुरस्कार मिळालेली व्यक्ती सदर पुरस्कार आयुक्तांना परत करेल.

(१२) पुरस्कार अर्जामध्ये अथवा कागदपत्रांमध्ये सादर केलेली माहिती खोटी असल्याचे सिध्द झाल्यास, अशा व्यक्तींना देण्यात आलेला पुरस्कार परत घेण्यात येईल व त्यांचे विरुध्द फौजदारी कारवाई करण्यात येईल.

(१३) राज्य निवड समितीने शासनास पुरस्कारार्थींची अंतिम शिफारस केल्या नंतर संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी संबंधित प्रस्तावित असलेल्या पुरस्कारार्थींचा चारित्र्य पडताळणी अहवाल पोलीस विभागाकडून प्राप्त करुन घेऊन क्रीडा व युवक सेवा संचालनालयास सादर करावा. सदरचा चारीत्र्य प्रमाणपत्र अहवाल प्रतिकुल असल्यास सदर पुरस्कारार्थीस अपात्र ठरविण्यात येईल.

(१४) सदर पुरस्कारासाठी शिफारस करतांना अर्जदारांची क्रीडा कामगिरी दि. १ जुलै ते ३० जून असे वर्ष ग्राह्य धरुन विचारात घेण्यात येईल. (साहसी क्रीडा प्रकारासाठी स्वतंत्र कालावधी निश्चीत केलेला आहे.)

(१५) शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार व अन्य पुरस्काराबाबतचे सर्व अंतिम निर्णय घेण्याचे अधिकार शासनास राहतील.

(१६) शासन निर्णयामधील सर्व पुरस्कारांसाठी पात्र खेळांपैकी एखाद्या खेळाचा पुरस्कार, अर्ज प्राप्त न झाल्याने अथवा पात्र उमेदवार न मिळाल्यामुळे पुरस्कार न देण्याचा निर्णय घेण्यात आला असेल तर तो पुरस्कार पात्र खेळाच्या अन्य उप प्रकारासाठी पुरस्काराची शिफारस करण्याचे अधिकार राज्य निवड समितीस राहतील.

**नियम क्रमांक ३) अर्जाची छाननी :**

- अर्जदाराने ऑनलाईन अर्जाची प्रत संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे सादर केल्यानंतर सदर अर्जाची छाननी जिल्हा क्रीडा अधिकारी व विभागीय उपसंचालक यांच्या स्तरावर करण्यात येईल.
- प्राथमिक छाननी आयुक्त (क्रीडा) यांचे अध्यक्षतेखालील समिती करतील, त्यानंतर संबंधित खेळाच्या राज्य संघटनांचे प्रतिनिधी फेर तपासणी करतील.
- आयुक्त, क्रीडा व युवक सेवा सर्व अर्जांची छाननी केलेले व प्रस्तावित केलेले गुणांकनासह, पात्र, अपात्रसह संकेतस्थळावर प्रसिध्द करुन सुचना व हरकती ७ दिवसात मागवतील.
- तद्नंतर अंतिम शिफारशीसाठी राज्य पुरस्कार निवड समिती समोर ठेवतील.
- प्रस्तावित असलेल्या पुरस्कारार्थींची अंतिम यादी घोषित करण्यापुर्वी संकेतस्थळावर प्रसिध्द केली जाईल. त्याबाबत कोणाचे आक्षेप किंवा हरकती असल्यास ७ दिवसात ऑनलाईन आक्षेप सादर करण्यात यावेत. अन्यथा पुरस्कारार्थींची अंतिम यादी शासनाकडून घोषित झाल्यानंतर कोणत्याही प्रकारच्या तक्रारींचा विचार केला जाणार नाही.
- उक्त समितीचे कामकाज सुलभरित्या पार पाडण्याच्या दृष्टीने आयुक्त, क्रीडा यांनी त्यांच्या स्तरावर पुरस्कार निहाय उपसमित्या गठीत कराव्यात.
- उपरोक्त पुरस्कार प्रक्रीयेचे वेळापत्रकामध्ये बदल करण्याचे अधिकार आयुक्त, क्रीडा यांना राहतील. समितीची रचना खालील प्रमाणे राहिल.

| अ.क्र | नाव | पद |
|---|---|---|
| १. | आयुक्त (क्रीडा) | अध्यक्ष |
| २. | सहसंचालक, क्रीडा | सह अध्यक्ष |
| ३. | विभागीय उपसंचालक | सदस्य |
| ४. | एकविध खेळ राज्य संघटनेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | संबंधीत खेळामध्ये प्राविण्य मिळविलेले खेळाडू (संघटनेमार्फत) | सदस्य |
| ६. | जिल्हा क्रीडा अधिकारी संबंधीत | सदस्य |
| ७. | उपसंचालक (क्रीडा) संबंधीत सदस्य | सदस्य सचिव |

**नियम क्रमांक ४) पुरस्कार निवडीचे वेळापत्रक :-**

१) दरवर्षी दि. २५ ऑक्टोबर पुर्वी वृत्तपत्रात/अधिकृत संकेतस्थळावर www.sports.maharashtra.gov.in प्रसिध्दी देऊन आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी क्रीडा मार्गदर्शक व खेळाडू यांच्या कडून दि. २५ नोव्हेंबर पर्यंत अर्ज मागविण्यात यावेत. दरम्यानच्या कालावधीत सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी जिल्ह्यातील सर्व संघटनांची सभा घेऊन पुरस्काराबाबत सर्व स्थानिक वृत्तपत्रामध्ये बातमी द्यावी. अर्जदाराने www.mumbaidivsports.com वेबसाईटवर उपलब्ध करुन दिलेल्या link वर अर्ज सादर करावा. ऑनलाईन अर्जाची एक प्रत अर्जदाराने संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्या कार्यालयात दि. ३० नोव्हेंबर पूर्वी स्वयंसाक्षांकित प्रमाणपत्रांसह सादर करावी. वेळापत्रकामध्ये बदल करण्याचे अधिकार आयुक्त, क्रीडा यांना राहतील.

२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे स्तरावर प्राथमिक छाननी समिती गठीत करुन सर्व अर्जांचे मुल्यांकन/गुणांकन करण्यात येईल.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी अर्जाची प्राथमिक छाननी झाल्यानंतर प्राथमिक पात्र / अपात्र उमेदवारांची नावे एकूण गुणांसह संकेतस्थळावर प्रसिध्द करुन ऑनलाईन हरकती/आक्षेप मागविण्यात येतील. ऑनलाईन प्राप्त आक्षेप व हरकती मागविण्यासाठी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी त्यासाठीचा कालावधी निश्चित करुन द्यावा. विहीत केलेल्या कालावधी नंतर प्राप्त हरकती, आक्षेप व सूचनांचा विचार केला जाणार नाही.

४) राज्यस्तरीय पुरस्कार निवड समितीच्या बैठकीत शासनास शिफारस करावयाच्या संभाव्य पुरस्कारार्थींच्या नावांची अंतिम यादी तयार करण्यात येईल.

५) छत्रपती शिवाजी महाराजांच्या जयंती निमित्ताने पूर्वनियोजीत ठिकाणी व वेळी “पुरस्कार वितरण समारंभ” आयोजित करण्यात यावा.

६) पुरस्कार प्रक्रीयेच्या सर्व वेळापत्रकामध्ये परिस्थितीनुरुप बदल करण्याचे अधिकार आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना राहतील.

७) सन २०१८-१९ या वर्षाचे पुरस्कार दि. १९ फेब्रुवारी, २०२० रोजी वितरित करण्याच्या अनुषंगाने क्रीडा संचालनालयाने आवश्यकतेनुसार वेळापत्रक निश्चित करावे.

**नियम क्रमांक ५) पुरस्कार निवड समिती :-** राज्यस्तरीय पुरस्कार निवड समिती पुढील प्रमाणे गठीत करण्यात येईल.

| अ.क्र. | सदस्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण | अध्यक्ष |
| २. | मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण | उपाध्यक्ष |
| ३. | अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ४. | महाराष्ट्रातील क्रीडा क्षेत्रातील पद्मविभूषण, पद्मभूषण, पद्मश्री तसेच राजीव गांधी खेलरत्न, द्रोणाचार्य व अर्जुन पुरस्कारार्थी यामधून पाच सदस्य | अशासकीय सदस्य (तज्ञ) |
| ५. | महाराष्ट्र ऑलिम्पिक व पॅरा ऑलिम्पिक असोसिएशन यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी | अशासकीय सदस्य |
| ६. | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

उपरोक्त अशासकीय सदस्यांची नियुक्ती पुढील तीन वर्षाकरीता असेल.

*******************

## परिशिष्ट “अ-१” नियमावली

## शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार

**नियम क्रमांक. १ : संक्षिप्त नांव :** या नियमांना **“शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार नियम, २०२०”** असे संबोधण्यात यावे.

**नियम क्रमांक २ : उद्दिष्ट :**

ज्येष्ठ क्रीडापटू किंवा क्रीडा मार्गदर्शक किंवा क्रीडा संघटक/कार्यकर्ते व क्रीडा क्षेत्राशी संबंधित अशा ज्या व्यक्तींनी क्रीडा व खेळांसाठी आपले सर्वस्व अर्पण करुन महाराष्ट्राच्या क्रीडा जीवनात अतुलनीय असे स्थान संपादन केले आहे व त्यांच्या व्यक्तीमत्वाचा, क्रीडा कार्यकर्तृत्वाचा आणि एकूणच त्यांच्या कामाचा महाराष्ट्राच्या क्रीडा जीवनावर संस्मरणीय असा प्रभाव पडला आहे, अशा क्रीडा महर्षिंचा गौरव करणे हे या पुरस्काराचे उद्दिष्ट आहे.

**नियम क्रमांक ३ :** दरवर्षी केवळ एका व्यक्तीला हा पुरस्कार देण्यात येईल.

**नियम क्रमांक ४ : पात्रतेचे निकष :**

महाराष्ट्रातील वय वर्षे ६० किंवा त्यापेक्षा अधिक वयाचे क्रीडापटू किंवा क्रीडामार्गदर्शक किंवा कार्यकर्ते/संघटक व क्रीडा क्षेत्रात काम करणाऱ्या इतर व्यक्ती, ज्यांनी आपल्या अतुलनीय कामगिरीने महाराष्ट्राच्या क्रीडा संस्कृतीची जोपासना केली आहे, त्यामध्ये लक्षणीय भर टाकली आहे आणि क्रीडा क्षेत्रात महाराष्ट्राचे नाव देशात व आंतरराष्ट्रीय पातळीवर उंचविण्यात संस्मरणीय अशी कामगिरी केली आहे किंवा क्रीडा क्षेत्रात मुलभूत स्वरुपाचे विशेष कार्य केले आहे, अशा व्यक्ती या पुरस्कारास पात्र राहतील.

**नियम क्रमांक ५:**

**१)** जीवन गौरव पुरस्कारासाठी महाराष्ट्रातील वय वर्षे ६० किंवा त्यापेक्षा अधिक वयाचे क्रीडापटू किंवा क्रीडा मार्गदर्शक किंवा कार्यकर्ते/संघटक व क्रीडा क्षेत्रात काम करणाऱ्या इतर व्यक्ती, ज्यांनी आपल्या अतुलनीय कामगिरीने महाराष्ट्राच्या क्रीडा संस्कृतीची जोपासना केली आहे अशा व्यक्तींच्या नावांची शिफारस करण्यासाठी प्रतिवर्षी नामनिर्देश करणेसाठी क्रीडा क्षेत्रातील बहुमुल्य योगदान दिलेल्या खेळाडू व्यक्तींकडून (केंद्र शासनाचे महाराष्ट्रामधील पुरस्कारार्थी - राजीव गांधी खेल रत्न पुरस्कार, क्रीडा क्षेत्रातील योगदानाबाबत पद्मश्री पुरस्कारार्थी व यापुर्वीचे शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कारार्थी) अशा व्यक्तींकडून जीवन गौरव पुरस्कारासाठी नामांकने मागविण्यात यावीत. उपरोक्त केंद्र शासनाचे पुरस्कारार्थी नामनिर्देश स्वरुपात त्यांच्या नावांची शिफारस संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, उपसंचालक किंवा संचालनालयास लेखी स्वरुपात करण्यात यावी.

२) नामांकन शिफारस करण्यासाठी उपरोक्त केंद्र शासनाच्या महाराष्ट्रामधील पुरस्कारार्थीकडून प्रत्येकी २ नामांकने मागविण्यात यावीत. सदर केंद्र शासनाच्या पुरस्कारार्थींकडून नामांकने मागविणेसाठी केंद्र शासनाच्या पुरस्कारार्थींची नांवे निश्चीत करण्याचा अधिकार आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहील.

***********************

## परिशिष्ट “अ-२”

## उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार नियम २०२०

**नियम क्रमांक १) संक्षिप्त नांव :**

या नियमांना **"उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक/जिजामाता पुरस्कार नियम २०२०"** असे संबोधण्यात यावे.

**नियम क्रमांक २ : उद्दीष्ट:-**

महाराष्ट्राच्या क्रीडा क्षेत्रामध्ये मार्गदर्शनपर अतुलनीय कामगिरी बजावून खेळाडुंना घडवून, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर सहभागी होण्यास उद्युक्त केले असेल अशा क्रीडा मार्गदर्शक यांचा सन्मान करणे तसेच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील खेळाडूचा दर्जा वाढवून राज्याचा लौकिक वाढविण्यासाठी प्रयत्न करणाऱ्या क्रीडा मार्गदर्शकांना उत्तेजन देणे असा आहे.

**नियम क्रमांक ३) पात्रतेचे निकष :**

३.१. एका पुरस्कार वर्षामध्ये खाली दर्शविल्याप्रमाणे जास्तीत जास्त तीन पुरस्कार देण्यात येतील. उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शकामधुन निवड झालेल्या महिला क्रीडा मार्गशकास देण्यात येणारा पुरस्कार हा जिजामाता पुरस्कार म्हणून गणण्यात येईल. तसेच दिव्यांग खेळाडू घडविणा-या मार्गदर्शकास प्रतिवर्षी एक पुरस्कार देण्यात यावा.

i. अॅथलेटिक्स, जिम्नॅस्टिक, मल्लखांब, जलतरण/डायव्हिंग व नेमबाजी या क्रीडा प्रकारासाठी एक पुरस्कार. (क्रीडा मार्गदर्शकाने वरीष्ठ राष्ट्रीय स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान १२ खेळाडू घडविलेले आवश्यक आहे.)

ii. कॅरम, कुस्ती, ज्युदो, तलवारबाजी, तायक्वांदो, धनुर्विद्या, लॉन टेनिस, टेबलटेनिस, ट्रायथलॉन, पॉवरलिफ्टिंग, बिलीयर्डस् अॅन्ड स्नूकर, बुध्दीबळ, बॅडमिंटन, वुशू, मुष्टीयुध्द, वेटलिफ्टिंग, शरीरसौष्ठव, सायकलींग, स्केटिंग, स्क्वॅश, अश्वारोहण (इक्वेस्टेरियन), मॉडर्न पेंटॅथलॉन, स्पोर्ट क्लाइंबिंग या वैयक्तिक खेळाकरीता एक पुरस्कार. (क्रीडा मार्गदर्शकाने वरीष्ठ राष्ट्रीय स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान १२ खेळाडू घडविलेले आवश्यक आहे.)

iii. आट्यापाट्या, कबड्डी, कयाकिंग/कॅनॉईंग, क्रिकेट, खो-खो, फुटबॉल, बास्केटबॉल, याटिंग, रोईंग, हॉकी, हॅन्डबॉल, व्हॉलीबॉल, वॉटरपोलो, रग्बी, बेसबॉल, **सॉफ्टबॉल** या सांघिक खेळाकरीता एक पुरस्कार देण्यात यावा. (क्रीडा मार्गदर्शकाने वरीष्ठ राष्ट्रीय स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान १५ खेळाडू घडविलेले आवश्यक आहे.) ( वरील खेळांमध्ये संबंधित संघटनेचा अहवाल घेण्यात यावा.)

iv. दिव्यांग खेळाडूंना घडविणारा मार्गदर्शक परिशिष्ट-अ-५ मधील नियम क्रमांक ६ मधील (२ मध्ये) नमूद केलेल्या खेळामधील दिव्यांग खेळाडू थेट पुरस्कारासाठी पात्र ठरल्यास एक जादा विशेष पुरस्कार म्हणून देण्यात यावा. (दिव्यांग खेळाडू घडविणा-या मार्गदर्शकाने वरीष्ठ पॅरा राष्ट्रीय स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान ८ खेळाडू घडविणे आवश्यक आहे.) तसेच गुणांकनाद्वारे प्रथम असलेल्या क्रीडा मार्गदर्शकास पुरस्कार देण्यात येईल.

३.२. पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणाऱ्या वर्षासह लगतपूर्व १५ वर्षामध्ये क्रीडा मार्गदर्शकाने घडविलेल्या खेळाडुंनी अत्युत्कृष्ट निकाल दाखवून अतुलनीय कामगिरी बजावली असली पाहिजे.

३.३. पुरस्कारासाठी अर्ज करणारा/ विचार करण्यात येणाऱ्या क्रीडा मार्गदर्शकाचे महाराष्ट्रातील वास्तव्य जन्मापासूनचे किंवा सलग पंधरा वर्षाचे असणे आवश्यक राहील. अशा क्रीडा मार्गदर्शकाने घडविलेला खेळाडू महाराष्ट्रातील अधिवासी असला पाहिजे व त्याने महाराष्ट्र राज्याचे वरिष्ठ राष्ट्रीय स्तरावर प्रतिनिधीत्व केले असले पाहिजे.

तथापि राज्यातील क्रीडा मार्गदर्शकाने घडविलेल्या राज्या बाहेरच्या खेळाडूची आंतरराष्ट्रीय दर्जाची कामगिरी लक्षात घेता येईल. तसेच परराज्यातील क्रीडा मार्गदर्शकाने महाराष्ट्रातील खेळाडूला घडविलेले किंवा प्रशिक्षण दिलेले असल्यास अश्या क्रीडा मार्गदर्शकांच्या मार्गदर्शनाची कामगिरी लक्षात घेऊन गुणांकनासाठी त्यांचा विचार करण्यात येईल.

३.४ पुरस्कार इच्छुक क्रीडा मार्गदर्शकाच्या कामगिरीचे मुल्यांकन, तो संबंधित खेळाडूचा मुळ क्रीडा मार्गदर्शक असल्यासच करावे. तसेच संबंधित खेळाडूस त्या क्रीडा मार्गदर्शकाने किमान ३ वर्षे मार्गदर्शन केलेले असणे आवश्यक आहे. जर एखाद्या खेळाडूने आपला क्रीडा मार्गदर्शक म्हणून आपल्या नात्यामधील एखादा नातेवाईक हा क्रीडा मार्गदर्शक म्हणून नमूद केलेला असेल तर अशा क्रीडा मार्गदर्शकाने सुध्दा वरीष्ठ राष्ट्रीय स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान ८ खेळाडू दिव्यांगसाठी,१२ खेळाडू वैयक्तिक खेळ व सांघिक खेळसाठी १५ खेळाडू घडविलेले असणे आवश्यक आहे. तसेच याबाबतची अधिक चौकशी करण्याचे अधिकार शासनास राहतील. त्यामध्ये जर गैर प्रकार अथवा खोटी माहिती दिलेली असल्याचे आढळून आल्यास असे हमीपत्र देणा-या खेळाडूला व अर्ज करणा-या संबंधित क्रीडा मार्गदर्शकाला काळया यादीत टाकण्यात येईल. अशांना पुन:श्च पुरस्कारासाठी अर्ज करण्यास अपात्र करण्यात येईल. तसेच संबंधित खेळाडू व क्रीडा मार्गदर्शकावर कायदेशीर गुन्हा नोंदविण्यात येईल.

३.५ मूळ क्रीडा मार्गदर्शक म्हणजे संबंधित खेळाडूने क्रीडा प्रशिक्षण ज्या क्रीडा मार्गदर्शकाकडून घेऊन त्याने यश संपादन केले असा क्रीडा मार्गदर्शक होय. मुळ क्रीडा मार्गदर्शकाने अर्जासोबत घडविलेल्या खेळाडूची विहीत नमुन्यातील हमी प्रतिज्ञापत्रावर परिशिष्ट अ-२.१ नुसार देणे आवश्यक राहील.

३.६ एखादया खेळाडूचे वेगवेगळे क्रीडा मार्गदर्शक असू शकतात व त्या सर्वांनी एकाच वर्षी पुरस्कारासाठी अर्ज केला असेल, तर संबंधित जिल्हयाचे जिल्हा क्रीडा अधिकारी, प्राचार्य, क्रीडा प्रबोधिनी व राज्य संघटनेच्या प्रतिनिधींना बोलावून प्रमाणपत्रांची पडताळणी करुन घेण्यात यावी व नंतर गुणांकन करण्यात यावे. एका कालावधीसाठी केवळ एका क्रीडा मार्गदर्शकाचा अर्ज ग्राहय धरण्यात येईल.

३.७ क्रीडा मार्गदर्शकांनी खेळाडूस किती वर्षे प्रशिक्षण दिले याचेही तुलनात्मक मूल्यमापन करण्यात यावे.

३.८ संघाबरोबर केवळ स्पर्धा कालावधीकरीता गेलेल्या प्रशिक्षकाची कामगिरी गुणांकनासाठी ग्राहय धरली जाणार नाही.

३.९ उत्कृष्ट क्रीडा पुरस्काराने सन्मानित केलेल्या क्रीडा मार्गदर्शकाने घडविलेल्या खेळाडूने उत्तेजक द्रव्य (डोपींग) घेतल्याचे आढळून आल्यास व उत्तेजक द्रव्यामुळे खेळाडूने संपादन केलेल्या कामगिरीचा विचार उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्काराकरिता झाला असल्यास अशा खेळाडूच्या मार्गदर्शकास देण्यात आलेला उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

३.१० खालील गुणांकोष्टकानुसार घडविलेल्या खेळाडूंच्या कामगिरीनुसार गुणांकनानंतर गुणानुक्रमे प्रथम येणा-या खेळाडूंचे त्या त्या विभागातील क्रीडा मार्गदर्शक पुरस्काराकरिता पात्र ठरतील. तसेच समान गुणांकन आल्यास अत्युच्च कामगिरी विचारात घेण्यात येईल.

३.११ शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू) नियम २०२० मधील परिशिष्ट अ-३.३ मधील कोष्टकामध्ये थेट पुरस्कारासाठी पात्र ठरणाऱ्या खेळाडूंचे क्रीडा मार्गदर्शक थेट पुरस्कारासाठी पात्र राहतील. तथापी अशा क्रीडा मार्गदर्शकाने वरिष्ट राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेत प्राविण्य प्राप्त किमान ८ खेळाडू दिव्यांगसाठी,१२ खेळाडू वैयक्तिक खेळ व सांघिक खेळसाठी १५ खेळाडू घडविणे आवश्यक राहील.

शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू) नियम, २०२० मधील नियम, ५ नुसार थेट पुरस्कारासाठी पात्र ठरणाऱ्या दिव्यांग खेळाडूंना घडविणारा मार्गदर्शक थेट पुरस्कारासाठी पात्र राहील. तथापि, संबंधित क्रीडा मार्गदर्शकाने राष्ट्रीय पॅरा स्पर्धा किंवा त्यावरील स्पर्धांमध्ये किमान ८ खेळाडू घडविलेले असणे आवश्यक राहील.

३.१२ क्रीडा मार्गदर्शकांसाठी असणा-या गुणांकन तक्त्यामध्ये नमूद केलेल्या आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये संबंधित खेळाडूंनी वैयक्तिक प्रत्येक क्रीडा प्रकारात/वजन गट/इव्हेंट मध्ये किमान ८ देशाच्या ८ खेळाडूंनी व सांघिक क्रीडा प्रकारात किमान ८ देशाच्या ८ संघांनी सहभाग असल्यासच सदर स्पर्धेमधील कामगिरीचे गुणांकन करण्यात येईल.

## <u>गुणांकन कोष्टक</u>

## थेट पुरस्कारा करीता स्पर्धा प्रकार व कामगिरी

| अ. क्र | क्रीडा स्पर्धेचा स्तर | स्पर्धेतील खेळाडूंची कामगिरी | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | पहिला क्रमांक | दुसरा क्रमांक | तिसरा क्रमांक | सहभाग |
| १. | ऑलिंपिक गेम्स/पॅरालिंपिक गेम्स् | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार |
| २. | जागतिक अजिंक्यपद स्पर्धा (वरिष्ठ गट)/जागतिक पॅरा क्रीडा स्पर्धा (चार वर्षांनी आयोजित होणारी)<br>जागतिक चषक (वरिष्ठ गट) (चार वर्षांनी आयोजित होणारी)<br>एशियन गेम्स/पॅरा एशियन गेम्स<br>कॉमनवेल्थ गेम्स/पॅरा कॉमनवेल्थ गेम्स | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | ६ गुण |
| ३. | ग्रँडस्लॅम स्पर्धा/डेव्हीस कप/फेड कप भारतीय संघाचे प्रतिनिधीत्व (वर्ल्ड ग्रुप व आशियाई ओशानीया ग्रुप) प्राविण्य (फक्त लॉन टेनिससाठी) | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | ६ गुण |
| | महाराष्ट्रातील एखादी महिला/पुरुष खेळाडू जर जागतिक क्रमवारीत एकेरी किंवा दुहेरीच्या अव्वल | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | -- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | मानांकनामध्ये १०० क्रमांकाच्या आत असले तर (फक्त लॉन टेनिससाठी) | | | | |
| | थॉमस कप/उबेर कप बॅडमिंटन स्पर्धा | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | ६ गुण |
| ४. | जागतिक बुध्दीबळ संघटना (फिडे) मधील आंतरराष्ट्रीय ग्रँड मास्टर, आंतरराष्ट्रीय महिला ग्रँड मास्टर, किताब प्राप्त करणारे खेळाडू | थेट पुरस्कार | | | -- |

| अ.क्र. | स्पर्धेचा प्रकार | प्रथम क्रमांक | द्वितीय क्रमांक | तृतीय क्रमांक | सहभाग |
|---|---|---|---|---|---|
| १. | आशियाई अजिंक्यपद/आशियाई चषक स्पर्धा/आशियाई पॅरा अजिंक्यपद स्पर्धा | १० गुण | ८ गुण | ६ गुण | ४ गुण |
| २. | कॉमनवेल्थ अजिंक्यपद स्पर्धा,<br>जाग़तिक क्रीडा स्पर्धा/जागतिक अजिंक्यपद स्पर्धा/जागतिक चषक स्पर्धा (वरिष्ठ गट) (प्रतिवर्षी/दोन वर्षांनी आयोजित होणा-या),<br>आंतरराष्ट्रीय मास्टर/ आंतरराष्ट्रीय महिला मास्टर चेस, वर्ल्ड लीग हॉकी स्पर्धा,<br>कॉमनवेल्थ पॅरा अजिंक्यपद स्पर्धा,<br>आशियाई पॅरा अजिंक्यपद स्पर्धा,<br>आंतरराष्ट्रीय क्रीकेट एक दिवसीय/टेस्ट सिरीज, २०-२० क्रीकेट<br>(सदर स्पर्धेत वैयक्तिक प्रत्येक क्रीडा प्रकार/वजनगटात/इव्हेंट मध्ये किमान ८ देशाच्या ८ खेळाडूंनी व सांघिक क्रीडा प्रकारात किमान ८ देशाच्या ८ संघानी सहभाग घेतलेला असणे आवश्यक राहील) | ८ गुण | ६ गुण | ४ गुण | २ गुण |
| ३. | जागतिक आंतरविद्यापीठ स्पर्धा | ७ गुण | ५ गुण | ३ गुण | १ गुण |
| ४. | हिंद केसरी किताब विजेता | ६ गुण | ४ गुण | २ गुण | १ गुण |
| ५. | युथ ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा, रणजी ट्रॉफी/दुलीप ट्रॉफी/देवघर ट्रॉफी/ इराणी ट्रॉफी/कुचबिहार ट्रॉफी, भारतीय ए संघासाठीचे आंतरराष्ट्रीय क्रीकेट एक दिवसीय/टेस्ट सिरीज, २०-२० क्रीकेट | ५ गुण | ३ गुण | २ गुण | -- |
| ६. | फेडरेशन कप (वरीष्ठ गट),<br>वरीष्ठ राष्ट्रीय अजिंक्यपद क्रीडा स्पर्धा पदक प्राप्त करणारा खेळाडू,<br>वरिष्ठ पॅरा राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा,<br>रणजी क्रिकेट स्तरावरील स्पर्धेमध्ये प्राविण्य प्राप्त संघाचा खेळाडू<br>राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा (National Games) पदक प्राप्त करणारा खेळाडू | ४ गुण | ३ गुण | २ गुण | १ गुण |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ७. | जागतिक/एशियन शालेय क्रीडा स्पर्धा,<br>खेलो इंडिया वरिष्ठ गट | ३ गुण | २ गुण | १ गुण | -- |
| ८. | सुदीरमन कप बॅडमिंटन स्पर्धा,<br>एशियन पॅरा गेम्स | -- | -- | -- | ६ गुण |

(वरिष्ठ गटाच्या अधिकृत आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये सुवर्ण / रौप्य / कांस्य पदक प्राप्त करणारा खेळाडू या स्पर्धेत वैयक्तिक क्रीडा प्रकारात किमान ८ देशाच्या ८ खेळाडूंनी व सांघिक क्रीडा प्रकारात किमान ८ देशाच्या ८ संघानी सहभाग घेतलेला असणे आवश्यक राहील)

## परिशिष्ट "अ-२.१"

**खेळाडू निहाय स्वतंत्र हमीपत्र देण्यात यावे (१०० रु. च्या बाँड पेपर वर देण्यात यावे)**

**(एक खेळाडू एका प्रशिक्षकाला एकदाच हमीपत्र देतील)**

मी श्री. / श्रीमती ........................................................................ खालील सही करणार ............................ या खेळाचा/खेळाची राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय खेळाडू असून मी खालील राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये सहभाग व प्राविण्य प्राप्त केले आहे.

| अ.क्र. | स्पर्धेचे नांव | वर्ष | आयोजन संघटना | प्राविण्य/सहभाग |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |
| ६ | | | | |
| ७ | | | | |

वर नमूद स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन संपादन केलेले यश हे मला माझे क्रीडा मार्गदर्शक श्री. / श्रीमती .............................. यांच्या प्रशिक्षणामध्ये प्राप्त झालेले आहे व त्यांनी मला दि. ........... ते दि........... पर्यंत एकूण ................ वर्ष प्रशिक्षण दिलेले आहे. पुरस्कार नियमावलीतील नियम ...... मध्ये नमूद केल्याप्रमाणे या क्रीडा मार्गदर्शकाने मला एकूण ............... वर्षे प्रशिक्षण दिले आहे ही अट पुर्ण होत असल्याने सदरचे हमीपत्र मी देत आहे.

वरिल कालावधीत नमुद केलेल्या स्पर्धांचे प्रमाणपत्र मी या क्रीडा मार्गदर्शकाला दिलेले आहे. यापुर्वी असे प्रमाणपत्र मी कुणालाही दिलेले नाही. वरिल सर्व माहिती मान्य असल्याचे मी प्रतिज्ञापत्रावर लिहून देत आहे. उपरोक्त माहिती खोटी/चुकीची आढळल्यास मी वैयक्तिक जबाबदार राहीन. याबाबत माझेवर कायदेशीर गुन्हा नोंदविण्यास हरकत नाही. तसेच मी पुरस्कारासाठी अर्ज करण्यास अपात्र राहीन याची मला जाणीव आहे.

दिनांक - खेळाडूची स्वाक्षरी -

ठिकाण - खेळाडूचे संपूर्ण नांव -

******************

## परिशिष्ट “अ-३”

## शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार ( खेळाडू )

**नियम क्रमांक १) संक्षिप्त नांव :-**

या नियमांना "शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू) नियम, २०२०" असे संबोधण्यात यावे.

**नियम क्रमांक २) उद्दिष्ट:**

क्रीडा क्षेत्रातील विशेष उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील खेळाडूंचा गौरव करणे हे या पुरस्काराचे उद्दिष्ट आहे.

**नियम क्रमांक ३) पात्रता निकष –**

१. केंद्र शासनाकडुन “अर्जुन पुरस्कार” प्राप्त झाल्यास शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार थेट पध्दतीने बहाल करण्यात येईल व तो “जादाचा पुरस्कार” समजला जाईल. त्यासाठी अर्ज करण्याची आवश्यकता असणार नाही.

२. खेळाडूने थेट पुरस्कारासाठी ग्राह्य धरण्यात आलेल्या आंतरराष्ट्रीय क्रीडा स्पर्धामधील कामगिरी (परिशिष्ट अ-३.३ नुसार) संपादन केली असल्यास थेट पुरस्कारासाठी पात्र राहील. सदरचा पुरस्कार जादाचा पुरस्कार समजण्यात येईल.

**३. जलतरण क्रीडा प्रकारामध्ये जलतरण या उप क्रीडा एक व डायव्हींग/ वॉटरपोलो या क्रीडा एक या प्रमाणे तसेच जिम्नॅस्टीक्स क्रीडा प्रकारामध्ये आर्टीस्टीक जिम्नॅस्टीक्स, रिदमिक जिम्नॅस्टीक्स या दोन स्वतंत्र व एरोबिक जिम्नॅस्टीक्स/ अ‍ॅक्रोबेटिक्स जिम्नॅस्टीक्स/ ट्रॅम्पोलीन या उप क्रीडा प्रकारासाठी एक या प्रमाणे स्वतंत्र पुरुष व महिलांसाठी पुरस्कार देण्यात येईल.**

**नियम क्रमांक ४) पुरस्कारासाठी पात्र क्रीडा व खेळ प्रकार:**

(१) पुरस्कारासाठी ऑलिंपिक, एशियन गेम्स, कॉमनवेल्थ गेम्स तसेच महाराष्ट्रातील पारंपारीक क्रीडा प्रकारातील खालील खेळ पुरस्कारासाठी पात्र राहतील.

(२) या व्यतिरिक्त ऑलिंपिक/आशियाई क्रीडा प्रकारात समाविष्ट असलेल्या खेळ प्रकार पुरस्कारासाठी ग्राह्य राहील. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा हे याबाबत शिफारस राज्य पुरस्कार निवड समितीस करतील.

| **पुरस्कारासाठी पात्र खेळ प्रकार** | | | | |
|---|---|---|---|---|
| १. धनुर्विद्या (आर्चरी) | १०. सायकलिंग | १९. कुस्ती (रेसलिंग) | २८. भारोत्तोलन (पॉवरलिफ्टिंग) | ३७. शरीर सौष्ठव (बॉडी बिल्डिंग) |
| २. मैदानी स्पर्धा (अ‍ॅथलेटिक्स) | ११. तलवारबाजी (फेन्सिंग) | २०. जलतरण (स्विमिंग,डायव्हींग, वॉटरपोलो) | २९. कबड्डी | ३८. यॉटींग |
| ३. बॅडमिंटन | १२. फूटबॉल | २१. कयाकिंग/कॅनोईंग | ३०. क्रिकेट | ३९. खो-खो |
| ४. वजन उचलणे (वेटलिफ्टिंग) | १३. मुष्ठीयुध्द (बॉक्सिंग) | २२. इक्वेस्टेरियन (अश्वारोहण) | ३१. बिलियर्डस अ‍ॅण्ड स्नुकर | ४०. मल्लखांब |
| ५. बास्केटबॉल | १४. व्हॉलीबॉल | २३. गोल्फ | ३२. स्केटिंग | ४१. कॅरम |
| ६. ज्युदो | १५. लॉनटेनिस | २४. रोईंग | ३३. स्क्वॅश | **४२. मॉडर्न पेंटॉथलॉन** |
| ७. हॅण्डबॉल | १६. नेमबाजी (शुटींग) | २५. ट्रायथलॉन | ३४. बुध्दीबळ (चेस) | **४३. बेसबॉल** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८. हॉकी | १७. टेबल टेनिस | **२६. सॉफ्टबॉल** | ३५. वुशू | **४४. स्पोर्ट क्लाइंबिंग** |
| ९. जिम्नॅस्टिक्स | १८. तायक्वाँदो | **२७. रग्बी** | ३६. आटयापाट्या | |

(३) शिवछत्रपती पुरस्कारासाठी पोटनियम (४) मधील निकषानुसार काही खेळ वगळणे वा नविन खेळ समाविष्ट करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(४) (i) ज्या खेळात वैयक्तिक कामगिरीवर विजेते अथवा उपविजेतेपद ठरले जाते ते खेळ अथवा क्रीडा प्रकार वैयक्तिक खेळ म्हणून संबोधण्यात येतील. उदा: कुस्ती, अॅथलेटिक्स (रिले सोडून), बॅडमिंटन (एकेरी), टेबल टेनिस (एकेरी) इत्यादी.

(ii) ज्या खेळामध्ये दोन अथवा दोनपेक्षा जास्त खेळाडू एकत्रित खेळून सांघिक कामगिरीच्या आधारावर विजेते/उपविजेते पद मिळवितात अशा क्रीडा प्रकारांना सांघिक खेळ म्हणून संबोधण्यात यावे. उदा. अॅथलेटिक्स (रिले), बॅडमिंटन (दुहेरी/मिश्र), टेनिस (दुहेरी/मिश्र), टेबल टेनिस (दुहेरी/मिश्र) इत्यादी.

**नियम क्रमांक ५) अर्ज करण्याची पध्दत:-**

(१) या पुरस्काराकरिता खेळाडूंना राज्य संघटनेव्दारे अथवा वैयक्तिकरित्या अर्ज करता येईल.

(२) राज्य संघटनेव्दारे अर्ज सादर करताना संघटनेने त्यांच्या सचिव यांनी प्रमाणित केलेला संबंधित खेळाडूच्या विहित नमुन्यातील वैयक्तिक तपशिला सोबत खालील कागदपत्रे जोडावीत .

(अ) खेळाडूंची सलग पाच वर्षातील राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय पातळीवर मिळविलेल्या क्रीडा नैपुण्य विषयक कामगिरी संबंधीच्या प्रमाणपत्राच्या झेराक्स प्रती सादर कराव्यात व त्या सक्षम अधिकाऱ्यांने प्रमाणित केलेल्या असाव्यात. राष्ट्रीय क्रीडा महासंघाने/एकविध खेळाच्या राज्य संघटनेने प्रदान केलेल्या विजेतेपदा बाबतच्या प्रमाणपत्रांच्या स्वसाक्षांकीत सत्यप्रती.

(ब) महाराष्ट्र राज्यातील अधिवास प्रमाणपत्र.

(क) खेळाडूचे पासपोर्ट आकाराचे पाच फोटो.

(ड) कार्यकारी समितीने संमत केलेल्या ठरावाची प्रत.

(इ) पुरस्कार वर्षा लगत पुर्व पाच वर्षामध्ये राष्ट्रीय/राज्य संघटनेने आयोजित केलेल्या आंतरराष्ट्रीय/ राष्ट्रीय/ राज्यस्तरीय अधिकृत अजिंक्यपद स्पर्धाची ठिकाणे व कालावधी याबाबतची माहिती संघटनेचे सचिव व अध्यक्ष यांनी साक्षांकीत करुन परिशिष्ट अ-३.१ मध्ये विहित केलेल्या नमुन्यात परिशिष्ट-अ-३.२ मधील प्रमाणपत्रासह सादर करावीत.

**नियम क्रमांक ६)** संबंधित खेळाडूची पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणाऱ्या वर्षासह लगतपूर्व पाच वर्षातील आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय, वरिष्ठ राज्य अजिंक्यपद स्पर्धेमधील कामगिरी पुरस्कारासाठी विचारात घेण्यात येईल.

६.१ खेळाडूस पुरस्कार वर्षापासून लगतपुर्व ५ वर्षामध्ये कोणत्याही तीन वर्षात संबंधित खेळाडूने अधिकृत संघातर्फे संबंधित खेळाच्या अधिकृत राष्ट्रीय फेडरेशनमार्फत आयोजित वरिष्ठ गटाच्या (सिनीअर) राष्ट्रीय स्पर्धेमध्ये/राष्ट्रीय स्पर्धा (नॅशनल गेम्स) मध्ये महाराष्ट्राच्या प्रातिनिधीक संघाकडून सहभागी होवून किमान एक पदक (प्राविण्य) संपादन केले आहे अशा खेळाडूंचा गुणांकना करिता विचार करण्यात येईल. एकाच वर्षामध्ये

वरिष्ठ राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा व राष्ट्रीय स्पर्धा (नॅशनल गेम्स) आयोजित झालेल्या असतील तर त्या दोन स्वतंत्र राष्ट्रीय स्पर्धा गणण्यात येतील.

६.२ थेट पुरस्काराकरिता पात्र असलेल्या खेळाडूस (परिशिष्ट अ-३.३ नुसार) लगतच्या पाच वर्षांपैकी किमान एक वर्षातील राष्ट्रीय स्पर्धेतील पदक संपादन केले असल्याची अट लागू राहणार नाही.

६.३ पुरस्कारासाठी ग्राह्य धरण्यात आलेल्या आंतरराष्ट्रीय क्रीडा स्पर्धामध्ये एकदा सहभाग व नॅशनल गेम्स् व राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा यामध्ये दोन वर्षे सहभाग घेवून प्राविण्य संपादन केले असल्यास अशा खेळाडूंना गुणांकनासाठी पात्र राहतील. (सदरची कामगिरी पुरस्कार मुल्यांकनासाठी ग्राह्य धरण्यात आलेल्या ५ वर्षामधील असणे आवश्यक आहे.)

६.४ काही खेळांमध्ये जागतिक अजिंक्यपद स्पर्धा किंवा जागतिक चषक स्पर्धा या दर चार वर्षांनी, दर दोन वर्षांनी किंवा दरवर्षी आयोजित होत असतात. थेट पुरस्कारासाठी विचार करताना यापैकी जास्तीत जास्त दीर्घ कालावधी नंतर आयोजित केलेल्या स्पर्धांमधील कामगिरी ग्राहय धरण्यात येईल.

**नियम क्रमांक ७)** खेळाडूने विहित नमुन्यातील वैयक्तिक तपशिला सोबत नियम ५ च्या पोटनियम (२) मधील (अ), (ब), (क) (ड) व (इ) येथे नमूद केलेली कागदपत्रे स्वसाक्षांकीत करुन जोडावीत. सादर केलेले प्रमाणपत्र खोटे आहे असे आढळून आल्यास त्या खेळाडू विरुध्द कायदेशीर कारवाई करण्यात यावी.

**नियम क्रमांक ८)** गुणांकनासाठी ग्राह्य धरल्या जाणाऱ्या क्रीडा स्पर्धांचे गुणकोष्टक परिशिष्ट (अ-३.३, ३.४ व ३.५) नुसार गणण्यात येईल.

**नियम क्रमांक ९)** ज्या खेळामध्ये वैयक्तिक व सांधिक अशा संयुक्त स्पर्धा होतात (उदा. ॲथलेटीक्स्, जिम्नॅस्टीक्स्, जलतरण, टेनिस, टेबल टेनिस, बॅडमिंटन इ.) अशाच खेळांसाठी खालील देण्यात आलेले गुणोत्तर प्रमाण ग्राहय धरण्यात येईल व त्यानुसार क्रीडा कामगिरीचे गुणांकन करण्यात येईल. ज्या खेळांमध्ये फक्त सांघिक स्पर्धा अथवा फक्त वैयक्तिक स्पर्धा असतील तर त्यांच्या क्रीडा कामगिरीचे नियमित सर्व साधारण गुणांकनानुसार गुणांकन करण्यात येईल.

**(i)** सांघिक क्रीडा प्रकारासाठी गुणांकन हे संघातील खेळाडूच्या संख्येनुसार गणण्यात येईल.

**(ii)** एखादया वैयक्तिक प्रकाराचे गुणांकन A आहे. तर सांघिक क्रीडा प्रकाराचे गुणांकन खालीलप्रमाणे करण्यात येईल.

उदा. एका संघात दोन खेळाडू असतील तर :- १.५ X A ÷ संघातील खेळाडू संख्या (A म्हणजे उदा.आशियाई अजिंक्यपद स्पर्धा - प्रथम क्रमांक १२ गुण) १.५ X १२ ÷ २ = ९ गुण

एका संघात तीन किंवा चार खेळाडू असतील तर :- २ X A ÷ संघातील खेळाडू संख्या

२ X १२ ÷ ४ = ६ गुण

एका संघात पाच ते दहा खेळाडू असतील तर :- ३ X A ÷ संघातील खेळाडू संख्या

३ X १२ ÷ ५ = ७.२ गुण

एका संघात दहा पेक्षा अधिक खेळाडू असतील तर :- ५ X A ÷ संघातील खेळाडू संख्या

५ X १२ ÷ ११ = ५ गुण

**(iii)** हा नियम ज्या खेळामध्ये वैयक्तिक व सांघिक अशा संयुक्त स्पर्धा होतात (उदा. ॲथलेटीक्स, जिम्नॅस्टीक्स, जलतरण, टेबल टेनिस, बॅडमिंटन इ.) अशाच बाबींसाठी सदरचे देण्यात आलेले गुणोत्तर प्रमाण (अर्जुन अवार्ड प्रमाणे) ग्राह्य धरण्यात यावे. फक्त सांघिक खेळ अथवा फक्त वैयक्तिक खेळाच्या स्पर्धा असतील तर देण्यात आलेले गुणोत्तर प्रमाण (अर्जुन अवार्ड प्रमाणे) लागू राहणार नाही. नियमित सर्व साधारण गुणांकनानुसार गुणांकन करण्यात येईल.

**नियम क्रमांक १०)** दिनांक १ जुलै ते ३० जून या कालावधीत दोन किंवा अधिक वरिष्ठ राष्ट्रीय / वरिष्ठ राज्यस्तर अजिंक्यपद स्पर्धांचे आयोजन करण्यात आले असेल तर त्या स्पर्धांची विभागणी गुणांकनासाठी त्या त्या वर्षात करण्यात येईल. तथापि नॅशनल गेम्स मधील सहभाग किंवा पदक याचे त्याच वर्षात अतिरीक्त स्वरूपात गुणांकन करण्यात येईल.

**नियम क्रमांक ११)** जो खेळाडू भारतीय ऑलिम्पिक संघटनेने आयोजित केलेल्या नॅशनल गेम्स मध्ये महाराष्ट्र राज्याचे प्रतिनिधीत्व करणार नाही किंवा असे प्रतिनिधीत्व करण्यास नकार देईल असे खेळाडू पुरस्कारासाठी अर्ज करण्यास पात्र राहणार नाहीत. थेट पुरस्कारार्थीसाठी ही तरतूद लागू राहणार नाही.

**नियम क्रमांक १२)** खेळाडूंच्या गुणांकनासाठी संबंधीत खेळाडू सहभागी झालेल्या अधिकृत आंतरराष्ट्रीय किंवा राष्ट्रीय स्पर्धेमध्ये वैयक्तिक प्रत्येक क्रीडा प्रकारात - वजन गट/इव्हेंट मध्ये किमान ८ देशांच्या/राज्यांच्या ८ खेळाडूंनी व सांघिक क्रीडा प्रकारात ८ देशांच्या/राज्यांचा ८ संघांचा सहभाग असल्यासच सदर स्पर्धेमधील कामगिरीचे गुणांकन करण्यात येईल. खेळाडूंच्या गुणांकनासाठी संबंधीत खेळाडू सहभागी झालेल्या अधिकृत आंतरराष्ट्रीय/राष्ट्रीय स्पर्धेमधील स्पर्धा प्रकारात सहभागी देशांचा/राज्यांचा नावासह सहभागाबाबतचे प्रमाणपत्र संबंधित खेळाच्या फेडरेशनने/राज्य संघटनेने संबंधित खेळाडूला देण्यात यावे व संबंधित खेळाडूने आपल्या ऑनलाईन अर्जामध्ये सोबत सादर करावे.

**नियम क्रमांक १३)** खेळाडूंचा वरीष्ठ राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धेतील सहभाग हा त्या त्या खेळाच्या राज्य संघटनेमार्फत महाराष्ट्र राज्याच्या संघातून असला पाहिजे. महाराष्ट्राचा खेळाडू हा महाराष्ट्र राज्याच्या संघामार्फत जरी खेळलेला नसेल, तसेच तो इतर राज्यांच्या संघामार्फत ही खेळलेला नसेल मात्र उदर निर्वाहाकरीता तो रेल्वे, बँक, पोलिस, एअर इंडिया, पेट्रोलियम बोर्ड व इतर अशा अनेक संस्था/कंपनीमध्ये नौकरी करीत असेल व त्यांच्यामार्फत वरीष्ठ राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा खेळलेला असेल अशा महाराष्ट्राच्या रहीवासी असलेल्या खेळाडूंच्या क्रीडा कामगिरीचा गुणांकनासाठी विचार करण्यात येईल. पुरस्कार प्राप्त झालेल्या खेळाडूंना राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा (नॅशनल गेम्स् मध्ये) महाराष्ट्र राज्याकडून खेळणे बंधनकारक राहील. याबाबीचे हमीपत्र अर्जदार खेळाडूने अर्जासोबत देणे आवश्यक राहील. पुरस्कार प्राप्त झाल्यानंतर त्या खेळाडूने या अटीचा भंग केल्यास संबंधित खेळाडूच्या सदर कृतीबाबत शिस्तभंगाच्या कार्यवाहीबाबतचा प्रस्ताव क्रीडा संचालनालयाद्वारे संबंधित प्राधिकरणास सादर करण्यात येईल.

**नियम क्रमांक १४)** अखिल भारतीय आंतरविदयापीठ स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन प्राविण्य प्राप्त करणारा खेळाडू हा महाराष्ट्र राज्यातील अधिकृत विदयापीठामार्फत सहभागी झालेला असावा. अशा खेळाडूंचाच अखिल भारतीय आंतरविदयापीठ स्पर्धा क्रीडा कामगिरीचा गुणांकनाकरीता विचार करण्यात येईल.

**नियम क्रमांक १५)** खेळाडूंच्या गुणांकनासाठी संबंधीत खेळाडू सहभागी झालेल्या अधिकृत राज्यस्तर स्पर्धेमधील स्पर्धा प्रकारात किमान ६० टक्के जिल्ह्यांचा सहभाग असल्यासच सदर स्पर्धेतील कामगिरीचे गुणांकन करण्यात येईल.

**नियम क्रमांक १६)** सर्व स्तरावरील स्पर्धेतील सहभागी संघांची संख्या संबंधित राज्य क्रीडा संघटनेने त्या त्या वर्षी क्रीडा संचालनालयास सादर करणे बंधनकारक राहील. त्यासोबत स्पर्धेचे ड्रॉ सोबत जोडावे.

**नियम क्रमांक १७)** सोबत जोडलेल्या परिशिष्ट"अ- ३.४ व ३.५" मधील गुण कोष्टकानुसार पुरस्कारासाठी परिगणित केलेल्या पाच वर्षांच्या कामगिरीपैकी सर्वोत्कृष्ट तीन वर्षात एकूण किमान १८ किंवा अधिक गुण प्राप्त करतील त्यापैकी सर्वाधिक गुण मिळविणाऱ्या एक पुरूष व एक महिला यांची पुरस्कारासाठी निवड करण्यात येईल.

**नियम क्रमांक १८)** एखाद्या खेळात दोन खेळाडूंना समान सर्वाधिक गुण प्राप्त झालेले असतील तर त्यापैकी वयाने ज्येष्ठ असलेल्या खेळाडूची निवड पुरस्कारासाठी करण्यात येईल. अशा दोन्ही खेळाडूंचे वय सारखे असल्यास अपवाद म्हणून दोन्ही खेळाडूंना पुरस्कार देण्याचा विचार करता येईल.

**नियम क्रमांक १९)** पुरस्कारासाठी विचारात घेतलेल्या स्पर्धांच्या काळात जर खेळाडूने उत्तेजक द्रव्य (डोपिंग) घेतल्याचे आढळून आल्यास संबंधित खेळाडूस देण्यात आलेला पुरस्कार रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

**नियम क्रमांक २०)** पुरस्कारासाठी अर्ज केलेल्या खेळाडूने सादर केलेली माहिती असत्य, चुकीची व दिशाभूल करणारी असल्याचे निदर्शनास आल्यास पुरस्कार रद्द करण्याचा अधिकार शासनास राहील व संबंधिता विरूद्ध भारतीय दंड संहितेनुसार कारवाई केली जाईल.

**नियम क्रमांक २१)** गुणांकन कोष्टकातील थेट पुरस्कारासाठी ग्राहय धरलेल्या आंतरराष्ट्रीय स्पर्धा व कामगिरी असणे आवश्यक राहील. सदरचा पुरस्कार जादा पुरस्कार देण्यात येईल.

**नियम क्रमांक २२)** जर एखाद्या क्रीडा प्रकारामध्ये पुरस्कारासाठी पात्र खेळाडू उपलब्ध झाले नाही तर सदरचा पुरस्कार अन्य ऑलिंपिक खेळामध्ये समाविष्ट असलेल्या खेळाच्या उपप्रकारामध्ये सर्वोत्तम कामगिरी केलेल्या खेळाडूस आयुक्त, क्रीडा यांचे स्तरावरील छाननी/शिफारस समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन पुरस्कार देण्याचे अधिकार राज्यस्तरीय पुरस्कार निवड समितीस राहतील. तथापि असे करताना प्रदान करावयाच्या शिवछत्रपती क्रीडा पुरस्कारांची संख्या एकूण पुरस्कार संख्येच्या (७ प्रकारच्या पुरस्कार संख्येच्या) मर्यादेतच राहील.

**नियम क्रमांक २३)** वैयक्तिक या क्रीडा प्रकारात ग्रॅन्डस्लॅम (विंबल्डन, फ्रेंच ओपन, यू. एस. ओपन व ऑस्ट्रेलियन ओपन) स्पर्धा, डेव्हीस कप स्पर्धा, फेडरेशन कप स्पर्धा, एटीपी स्पर्धा व डब्ल्यूटीए स्पर्धा या सर्वोच्च महत्वाच्या आंतरराष्ट्रीय स्पर्धा आहेत त्यामुळे या स्पर्धांमधील कामगिरीचा गुणांकनासाठी विचार करण्यात येईल.

**नियम क्रमांक २४)** शरीरसौष्ठव क्रीडा स्पर्धांमध्ये सर्व वजन गटांमधील विजेत्यांची स्पर्धा घेवून चॅम्पियन ऑफ चॅम्पियन निवडण्यात येतो. (उदा. आंतरराष्ट्रीय स्तरावर मिस्टर आशिया, राष्ट्रीय स्पर्धेतील विजेत्यांना भारत श्री, राज्य स्पर्धेतील विजेत्यांना महाराष्ट्र श्री) अशा खेळाडूंना अतिरीक्त ५ गुण देण्यात येतील.

## परिशिष्ट “अ-३.१”
## शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू) नियम

(१) खेळाडूचे नांव :-कुमार/कुमारी/श्री/श्रीमती ---------------------------------------

(२) पत्ता :-

(३) खेळाचा प्रकार :-

| अ क्र | स्पर्धेचे नांव | स्पर्धेचा स्तर | ठिकाण | कालावधी | स्पर्धेतील कामगिरी प्रथम/व्दितीय/तृतीय | स्पर्धा अधिकृत अजिंक्यपद स्पर्धा आहे किंवा नाही, याबाबतचे स्वयंस्पष्ट अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | |
| २ | | | | | | |
| ३ | | | | | | |
| ४ | | | | | | |
| ५ | | | | | | |

## परिशिष्ट “अ-३.२”
## प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, कुमार/कुमारी/श्री/श्रीमती ---------------------------------------------- खेळाडू नोंदणी क्रं. -------------------------------------------- हे/ या ---------------------------- ------------ या खेळाचा खेळाडू असून या खेळास भारतीय ------------------------------------- ( खेळाचे नांव लिहावे ) महासंघाची /महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनची / भारतीय ऑलिम्पिक असोसिएशनची मान्यता आहे. कुमार/कुमारी/श्री/श्रीमती ------------------------------------यांनी अर्जामध्ये नमूद केलेली कामगिरी, संघटनेच्या कागदपत्रांनुसार बरोबर आहे/नाही. कुमार/कुमारी/श्री/श्रीमती ---------------------- ------------------ हे/ या शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कारासाठी अर्ज करण्यास पात्र आहेत/नाहीत.

स्थळ :

दिनांक:

संघटनेचीमोहोर (स्वाक्षरी) (स्वाक्षरी)

सचिव अध्यक्ष

संघटनेचेनाव संघटनेचेनाव

टिप : (१) अपात्र प्रमाणित केलेल्या खेळाडूबाबतची स्वयंस्पष्ट कारणमीमांसा स्वतंत्र कागदावर संघटनेचे सचिव व अध्यक्ष यांच्या संयुक्त सही शिक्यानिशी देण्यात यावी.

(२) लागू असेल तेथे ( ) अशी खूण करावी.

